**उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम (एच.एस.सी. व्होकेशनल) या अभ्यासक्रमाची औ.प्र.संस्थां मधील इतर अभ्यासक्रमाशी पर्यायी शैक्षणिक अर्हता निश्चित करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक व्हीओसी २००९/(४५ /०९)/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ ऑगस्ट, २०१०

**संदर्भ :** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-१०८८/५१५१८/(७०३)/ ताशि-२-ड, दिनांक २८.१०.१९८८
२) प्रभारी संचालक, व्यवसाय शिक्षण यांचे पत्र क्रमांक ९/व्हीओसी/२२०३/२००८/१९० दिनांक १६.६.२००८
३) प्रभारी संचालक, व्यवसाय शिक्षण यांचे पत्र क्रमांक ९/व्हीओसी/२२०३/समकक्षता /२००८/४६०, दिनांक १३.१२.२००८
४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२००८/(२८६/०८)/ व्यशि-३, दिनांक २ मार्च, २००९
५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२००८/(११६/०८)/ व्यशि-३, दिनांक २ मार्च, २००९
६) संचालक, प्रशिक्षण यांचे पत्र क्रमांक १/समकक्षता/एमसीव्हीसी/ २२०३/२००९/५५ दिनांक ८.७.२००९

**प्रस्तावना** - केंद्र शासनाच्या शैक्षणिक धोरणानुसार राज्यामध्ये सन १९८८-८९ पासून शासकीय व अशासकीय संस्थांमध्ये किमान कौशल्यावर आधारित व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यात आलेले आहेत. संदर्भाकित क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये +२ स्तरावरील किमान कौशल्यावर आधारित व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नावात शैक्षणिक वर्ष २००९-१० पासून बदल करुन उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम (H.S.C.Vocational) अशी सुधारणा करण्यात आली आहे. राज्यामध्ये ५३ शासकीय, ९२४ अशासकीय अनुदानित, १५२ अशासकीय विना अनुदानित अशा एकूण ११२९ संस्थामध्ये हे अभ्यासक्रम सुरु आहेत. या अभ्यासक्रमांतर्गत ७० टक्के व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रम व ३० टक्के सामान्य शिक्षण अभ्यासक्रम यांचा अंतर्भाव असतो. सदर अभ्यासक्रम जास्तीत जास्त प्रात्यक्षिकाभिमूख व कार्यानुभव पध्दतीवर असून विद्यार्थ्यांना संबंधित विषयाशी निगडित किमान कौशल्य प्राप्त करुन स्वयंरोजगार सुरु करावा अथवा औद्योगिक आस्थापनामध्ये नोकरी करावी असे अपेक्षित आहे. औद्योगिक आस्थापनेकडून सुध्दा औ.प्र.संस्थे मधून व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण विद्यार्थ्यांना प्राधान्य दिले जाते. पर्यायाने एच.एस.सी. व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण विद्यार्थी उच्च शिक्षणाकडे वळतांत व योजनेचा मुळ उद्देश सफल होत नाही. या सर्व बाबी लक्षात घेऊन उच्च माध्यमिक व्यवसाय (एच.एस.सी.व्होकेशनल) अभ्यासक्रम इतर कोणत्या अभ्यासक्रमाशी समकक्ष होऊ शकतात (उदा.औ.प्र.संस्थामध्ये व्यवसाय अभ्यासक्रम, पदविका, पदवीशी) व त्यामुळे एमसीव्हीसी उमेदवारांना नोकरीची संधी उपलब्ध होतील या बाबींचा अभ्यास करण्यात आला.

प्रत्येक खात्याच्या विविध पदांसाठी शैक्षणिक अर्हता निश्चित करण्यात आलेली आहे. उच्च माध्यमिक व्यवसाय (H.S.C.Vocational) अभ्यासक्रमाची इतर अभ्यासक्रमांशी पर्यायी शैक्षणिक अर्हता (Alternative Qualification) निश्चित केल्यास सदर अभ्यासक्रम पूर्ण करणा-या विद्यार्थ्यांना काही प्रमाणांत शासकीय नोक-यांमध्ये संधी मिळू शकते. औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील अभ्यासक्रमांची रचना व निश्चिती डि.जी.ई.टी., नवी दिल्ली यांचेमार्फत करण्यात येते. त्यामुळे औ.प्र.संस्थामधील अभ्यासक्रमांशी उच्च माध्यमिक व्यवसाय (H.S.C.Vocational) अभ्यासक्रमांची समकक्षता

ठरविण्याचे अधिकार, डि.जी.ई.टी., नवी दिल्ली यांना आहेत. त्यामुळे १) दोन्ही योजनांमधील अभ्यासक्रमांसाठी प्रवेशासाठी शैक्षणिक अर्हता. २) दोन्ही योजनांमधील अभ्यासक्रमांसाठी प्रशिक्षण कालावधी. ३) दोन्ही योजनांमधील अभ्यासक्रमासाठी पाठयक्रमांची तुलना ८०% पेक्षा अधिक असावी. ४) शिकाऊ उमेदवारी योजनेत अभ्यासक्रमांचा समावेश असावा. या मुद्यांच्या आधारे समकक्षता न ठरविता काही अभ्यासक्रमाबाबत पर्यायी शैक्षणिक अर्हता (Alternative Qualification) निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद्र सर्व बाबींचा विचार करुन खालीलप्रमाणे उच्च माध्यमिक व्यवसाय (H.S.C.Vocational) अभ्यासक्रमांसाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील त्यांचे नांवासमोर दर्शविलेल्या ६ अभ्यासक्रमाशी पर्यायी शैक्षणिक अर्हता (Alternative Qualification) म्हणून ग्राहय धरण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम पर्यायी शैक्षणिक अर्हता तपशिल.**

| अ. क्र. | उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण + शिकाऊ उमेदवारीपूर्ण (HSC Vocational + ATS) | उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमास पर्यायी शैक्षणिक अर्हता ठरु शकतील असे औ.प्र. संस्थामधील अभ्यासक्रम | शेरा |
|---|---|---|---|
| १ | रिपे.मेंटे.ॲण्ड रिवाईंडींग ऑफ इलेक्ट्रिक मोटर्स | वायंडर (आर्मेचर) | उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम व तत्सम व्यवसायांतील शिकाऊ उमेदवारी पूर्ण केलेली शैक्षणिक अर्हता ही शिल्पकारागीर प्रशिक्षण योजनेंतर्गत (औ.प्र.संस्था उत्तीर्ण) पूर्ण केलेल्या शैक्षणिक अर्हतेला पर्यायी शैक्षणिक अर्हता ठरु शकते. |
| २ | इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजी | मेकॅ.इलेक्ट्रॉनिक्स | |
| ३ | मेकॅनिकल टेक्नॉलॉजी | जोडारी, कातारी व संधाता | |
| ४ | ऑटो. इंजि.टेक्निशियन | यांत्रिक मोटारगाडी | |
| ५ | बेकरी ॲण्ड कन्फेक्शनरी | ब्रेकरी ॲण्ड कन्फेक्शनरी | |
| ६ | कुकरी | क्राफ्टसमन फूड प्रोडक्शन (व्हेज) | |

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणकीय सांकेतांक क्र.२०१००८१२२०५१२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(शोभा वि. पत्की)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१) संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
२) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
३) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई /नाशिक/ पुणे/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपुर ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
४) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग), मुंबई/पुणे/नाशिक /कोल्हापूर/नागपूर / अमरावती/लातूर/औरंगाबाद. ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
५) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
६) मा. मंत्री (उ व तं. शि), यांचे खाजगी सचिव
७) मा. राज्यमंत्री (उ व तं.शि), यांचे खाजगी सचिव.
८) निवड नस्ती (व्यशि-४)